**सन २०२३-२०२४ या वर्षाकरीता "कोरोना (कोविड-१९) संसर्गामुळे दोन्ही पालक गमावलेल्या ० ते १८ वर्षे वयोगटातील बालकांसाठी अर्थसहाय्य उपलब्ध करुन देणेबाबत" या योजनेकरिता निधी वितरीत करणे.**

**महाराष्ट्र शासन**
**महिला व बाल विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक अनाथ-२०२३/प्र.क्र.१०५/का-०३**
नवीन प्रशासन भवन, तिसरा मजला,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक- २८ मार्च, २०२४

**वाचा :-** शासन निर्णय, महिला बाल विकास विभाग, क्र. अनाथ -२०२१/प्र.क्र. ४९/का.०३ दिनांक १७ जून, २०२१.

**प्रस्तावना :-** केंद्र शासनाच्या "PM CARES For Children- Empowerment of COVID Affected Children" ह्या योजनेव्यतिरिक्त राज्य शासनाकडून कोरोना (कोविड-१९) संसर्गामुळे दोन्ही पालक गमावलेल्या ० ते १८ वर्षे वयोगटातील बालकांसाठी अर्थसहाय्य उपलब्ध करुन देण्याच्या अनुषंगाने महिला व बाल विकास विभाग शासन निर्णय उपरोक्त वाचा क्र.१ अन्वये निर्गमित करण्यात आलेला आहे.

"कोरोना (कोविड-१९) संसर्गामुळे दोन्ही पालक गमावलेल्या ० ते १८ वर्षे वयोगटातील बालकांसाठी अर्थसहाय्य उपलब्ध करुन देणेबाबत" या योजनेकरिता वित्त विभागाने रु. ५०.०० लाख एवढा निधी वितरीत करण्यास मान्यता दिली आहे. त्यानुसार सदर योजनेकरिता सन २०२३-२४ या वर्षाकरिता अर्थसंकल्पित निधीमधून उपरोक्त रु. ५०.०० लाख एवढा निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

"कोरोना (कोविड-१९) संसर्गामुळे दोन्ही पालक गमावलेल्या ० ते १८ वर्षे वयोगटातील बालकांसाठी अर्थसहाय्य उपलब्ध करुन देणेबाबत" या योजनेसाठी सन २०२३-२४ या वर्षासाठीच्या अर्थसंकल्पित निधीमधून रु. ५०,००,०००/- (अक्षरी रुपये पन्नास लाख फक्त) इतका निधी आयुक्त, महिला व बाल विकास, पुणे यांना वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे. तसेच सद्य:स्थितीत या योजनेमध्ये अर्थसहाय्यासाठी पात्र बालकांचे वय उतरत्या क्रमाने (जास्त ते कमी) विचारात घेऊन पहिल्या १० मुलांना योजनेचा लाभ देण्यात यावा.

हा खर्च मागणी क्रमांक क्र. एक्स-१, २२३५ सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२ समाज कल्याण, १०२ बाल कल्याण,१९ कोविड-१९ कालावधीत अनाथ झालेल्या बालकांसाठी अर्थसहाय्य(१९) (०१) कोविड-१९ कालावधीत अनाथ झालेल्या बालकांसाठी अर्थसहाय्य योजना, ३१, सहायक अनुदाने (वेतनेतर) (२२३५C५०१) या लेखाशिर्षाखाली सन २०२३-२४ या वित्तीय वर्षाकरिता मंजूर असलेल्या तरतुदीतून भागविण्यात यावा.

सदर योजनेंतर्गत वितरीत निधीचा विनियोग करण्यासाठी आयुक्त, महिला व बाल विकास, पुणे यांना नियंत्रक अधिकारी तथा संनियंत्रक तसेच आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. आयुक्त, महिला व बाल विकास, पुणे यांनी सदर निधी खर्च करतांना वित्त व नियोजन विभागाने वेळोवेळी निर्गमीत केलेले आदेश, सूचना, परिपत्रके, अटी व शर्तीचे काटेकोरपणे पालन करावे. तसेच सदर निधीच्या खर्चाबाबतचे उपयोगिता प्रमाणपत्र विहित नमुन्यामध्ये शासनास सादर करावे.

हा शासन निर्णय, वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.९८/व्यय-६ दिनांक २७/०३/२०२४ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध असून त्याचा संगणक संकेतांक २०२४०३२८१५१९२२४१३० असा आहे. सदरचा निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

KHADIJA FAROOQUE NAIKWADE

Digitally signed by KHADIJA FAROOQUE NAIKWADE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WOMEN AND CHILD DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=8cd35f5dfe17a9e9a0cd531b6bb11d782183e791bc817e7a736def213ac7d71b, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=6F53F8BF0DEB07218B68698BE9E71A15840F8812D6E796D15093EAEC9A19F0DF, cn=KHADIJA FAROOQUE NAIKWADE
Date: 2024.03.28 17:33:58 +05'30'

( ख. फा. नाईकवाडे)
कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रति,

१. मा.राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई,
२. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई,
३. मा.अध्यक्ष/उपाध्यक्ष/ सदस्य, विधानसभा/ विधानपरिषद, विधानमंडळ, मुंबई,
४. मा.विरोधी पक्षनेता, विधानसभा/ विधानपरिषद, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
५. मा.मंत्री/ राज्यमंत्री, महिला व बाल विकास यांची खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
६. सचिव, महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबई,
७. प्रधान सचिव (व्यय), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई,
८. आयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय, पुणे,
९. महालेखापाल- महाराष्ट्र-१/२ (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई / नागपूर,
१०.महालेखापाल- महाराष्ट्र-१/२ (लेखा परिक्षा), मुंबई / नागपूर,
११.सर्व उपसचिव, सर्व अवर सचिव, महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबई,
१२.उपायुक्त (बाल विकास), महिला व बाल विकास आयुक्तालय,पुणे,
१३.कक्ष अधिकारी, वित्त विभाग (व्यय-६/ अर्थसंकल्प-७), मंत्रालय, मुंबई,
१४.कक्ष अधिकारी, नियोजन विभाग (का-१४७२), मंत्रालय, मुंबई,
१५.कक्ष अधिकारी (अर्थसंकल्प), महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबई यांना सदर निधी बी.डी.एस. प्रणालीवर वितरीत करण्याच्या विनंतीसह अग्रेषित.
१६.सर्व जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी,
१७.सर्व कार्यासने, महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबई,
१८. निवड नस्ती, का-०३.